महाराष्ट्रातील गड / किल्लयांचे पावित्र्य राखण्याच्या दृष्टीने दारुच्या अंमलाखाली गैरवर्तन करणाऱ्या समाजकंटकांना आळा घालण्याच्या दृष्टीने करावयाच्या उपाययोजना.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
**शासन परिपत्रक, क्र:एमआयएस-०१२०/प्र.क्र.२७/राउशु-३,**
५ वा मजला (विस्तार), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२,
दिनांक :- १ फेब्रुवारी, २०२०.

<u>शासन परिपत्रक</u>

महाराष्ट्रातील गड/ किल्ले हे महाराष्ट्राच्या सुवर्ण इतिहासाचे साक्षीदार आहेत. या गड/ किल्ल्यांचे पूर्णपणे पावित्र्य राखणे गरजेचे आहे. मात्र, या गड/ किल्ल्यांना भेट देताना काही समाजकंटक मद्याचे सार्वजनिक ठिकाणी सेवन करतात. तसेच, मद्याच्या अंमलाखाली सार्वजनिक शांततेस बाधा पोहचेल असे गैरप्रकार / गैरवर्तन करणे, गड / किल्ल्यावरील वैभवशाली पुरातन वास्तूचे नुकसान करणे यासारखे, गड/ किल्ल्यांचे पावित्र्य भंग करण्याचे प्रकार करीत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहेत. याअनुषंगाने, अशा प्रकारे गड / किल्ल्यांचे पावित्र्य भंग करणाऱ्या समाजकंटकांना आळा बसावा, या दृष्टीकोनातून खालीलप्रमाणे सूचना विहित करण्यात येत आहेत :-

१) ज्या ठिकाणी मद्य प्राशन करण्यास परवानगी देण्यात आली आहे, अशी जागा वगळता अन्य सार्वजनिक ठिकाणी दारुच्या नशेत गैरशिस्तीने वागल्यास, या गैरवर्तनाबाबत महाराष्ट्र दारुबंदी अधिनियम, १९४९ (सन १९४९ चा २५) मधील कलम ८५ अन्वये शिक्षेबाबतच्या तरतूदी खालीलप्रमाणे आहेत:-

***महाराष्ट्र दारुबंदी अधिनियम, १९४९ (सन १९४९ चा २५)***

***कलम ८५. दारु पिऊन धुंद झाल्याबद्दल व गैरशिस्त वागणुकीबद्दल शास्ती:***

*(१) जी कोणतीही व्यक्ती, कोणत्याही सडकेवर अथवा सार्वजनिक जागी किंवा ज्या कोणत्याही जागी लोकांना प्रवेश मिळू शकतो अथवा प्रवेशाची परवानगी मिळू शकते अशा जागी दारुच्या नशेत गैरशिस्तीने वागेल तिला, सिध्दापराध ठरविण्यात आले असता ;*

*(क) पहिल्या अपराधाबद्दल, सहा महिन्यापर्यंत असू शकेल इतक्या सश्रम कैदेची व "दहा हजार रुपयांपर्यंत" असू शकेल इतक्या दंडाची शिक्षा होईल.*

*परंतु न्यायालयाच्या निकालपत्रात तद् विरुध्द नमूद करण्यात येतील अशा विशेष व पुरेशा कारणांअभावी अशी कैदेची शिक्षा तीन महिन्यापेक्षा कमी असता कामा नये व असा दंड "पाच हजार रुपयांपेक्षा" कमी असता कामा नये, आणि*

*(ख) नंतरच्या अपराधाबद्दल, एक वर्षापर्यंत असू शकेल इतक्या सश्रम कैदेची व तसेच "दहा हजार रुपये" दंडाची शिक्षा होईल.*

*परंतु न्यायालयाच्या निकालपत्रात तद् विरुध्द नमूद करण्यात येतील अशा विशेष व पुरेशा कारणांअभावी अशी कैदेची शिक्षा सहा महिन्यापेक्षा कमी असता कामा नये व असा दंड "सात हजार पाचशे रुपयांपेक्षा" कमी असता कामा नये.*

*(२) पोट कलम (१) खालील अपराध केल्याबद्दल चालविलेल्या खटल्यात, तद्विरुध्द सिध्द करण्यात येईपर्यंत, असा अपराध केल्याबद्दल ज्या व्यक्तीवर आरोप ठेवला आहे अशी व्यक्ती औषधी कारणांसाठी नव्हे तर नशा येण्यासाठी दारु प्यायली आहे किंवा कोणत्याही इतर मादक द्रव्याचे तिने सेवन केले आहे असे गृहीत धरण्यात येईल.*

**२)** राज्यातील गड/ किल्ल्यांचे पावित्र्य अबाधित राहण्यासाठी, गड/ किल्ल्यांवर दारु पिणे, तसेच, दारुच्या नशेत गैरवर्तन करणे, गड/ किल्ल्यावरील पुरातन वास्तूचे नुकसान करणे या बाबींपासून समाजकंटकांना परावृत्त करण्याच्या दृष्टीने, असे गैरप्रकार / गैरवर्तन होत असल्याचे आढळून आल्यास संबंधितांविरुध्द तात्काळ कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल, अशा स्पष्ट सूचना देऊन, महाराष्ट्र दारुबंदी अधिनियम, १९४९ (सन १९४९ चा २५) मधील कलम ८५ अन्वये विहित करण्यात आलेल्या शिक्षेबाबतच्या उपरोक्त तरतूदी ठळकपणे नमूद केलेला फलक पुरातत्व विभागामार्फत गड / किल्ल्यांच्या प्रवेशद्वाराजवळ दर्शनी भागात सर्वांच्या माहितीसाठी लावण्यात यावा.

**३)** राज्यातील गड/ किल्ल्यांवर दारु पिणे तसेच, दारुच्या नशेत गैरवर्तन करणे असे गैरप्रकार होत असल्याचे आढळून आल्यास, संबंधित समाजकंटकास तात्काळ पोलीस अथवा राज्य उत्पादन शुल्क विभागामार्फत ताब्यात घेऊन संबंधितांविरुध्द महाराष्ट्र दारुबंदी अधिनियम, १९४९ (सन १९४९ चा २५) मधील कलम ८५ अन्वये गुन्हा नोंदविण्यात यावा व याअनुषंगाने आवश्यक ती कायदेशीर कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

**४)** वरील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याबाबत सर्व पोलीस घटक प्रमुख तसेच अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांनी आपल्या अधिपत्याखालील यंत्रणेस सूचना द्याव्यात व याची अंमलबजावणी होईल याकडे कटाक्षाने लक्ष द्यावे.

सदर शासन परिपत्रक गृह विभाग (पोलिस) आणि सांस्कृतिक कार्य विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००२०११२३३०१५३२९ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Shahaji Yadav

Digitally signed by Sudhakar Shahaji Yadav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, cn=Sudhakar Shahaji Yadav
Date: 2020.02.01 12:11:31 +05'30'

**( सुधाकर श.यादव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१०. प्रधान सचिव (पर्यटन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
११. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. सर्व पोलीस आयुक्त / पोलीस अधीक्षक.
१६. सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
१७. संचालक, पुरातत्व व वस्तूसंग्रहालये संचालनालय, मुंबई,
१८. संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई.
१९. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,
२०. निवड नस्ती.